ग्राम विकास विभागांतर्गत
"राज्य पेसा कक्षाचे"
बळकटीकरण व विस्तार

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पेसाअ-२०२२/प्र.क्र.०९/पं.रा-२**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीख: **१९ जून, २०२३**

**संदर्भ :-**

१. आदिवासी विकास विभागाकडील शासन निर्णय क्र.व्हीआयपी-२०१२/प्र.क्र.३७/कार्या-१६, दिनांक २३ जानेवारी, २०१३.
२. ग्राम विकास विभागाकडील शासन निर्णय क्रमांक: पेसाअ-२०१६/प्र.क्र.२३/पं.रा-२, दिनांक १५ जुलै, २०१६.
३. संचालक, राज्य (पेसा) यांचेकडील मुळ प्रस्ताव दिनांक २७ जानेवारी, २०२१ व सुधारीत प्रस्ताव दिनांक ०५ जुलै, २०२१.
४. पेसा कक्षाच्या बळकटीकरणासाठी ८० "काल्पनिक" पदांना मान्यतेबाबत वित्त विभागाकडील पत्र क्रमांक: पदनि-२०२२/प्र.क्र.४८/आपुक, दिनांक ३० डिसेंबर, २०२२.
५. वित्त विभागाकडील शासन निर्णय क्रमांक पदनि २०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दिनांक २७ एप्रिल, २०२२.
६. वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौस ७३/आपुक, दिनांक ७ फेब्रुवारी, २०२३ व अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौस ९५/व्यय-१५, दिनांक २७ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

भारतीय संविधानाच्या ७३ व्या घटना दुरूस्तीने, भाग ९ मध्ये "पंचायतीचे" उपबंध समाविष्ट करण्यात आले असून, **"पंचायतीसंबंधीचे उपबंध (अनुसूचित क्षेत्रावर विस्तारित करणे) अधिनियम, १९९६"** (पेसा कायदा) अन्वये अनुसूचित क्षेत्रावर हे उपबंध विस्तारित करण्यात आले आहेत. अनुसूचित क्षेत्रातील पंचायतींना स्वयंशासनाच्या संस्था म्हणून काम करणे शक्य व्हावे; यासाठी आवश्यक असतील असे अधिकार व प्राधिकार पंचायतींना बहाल करणे, हा या कायद्याचा मुख्य उद्देश आहे.

राज्याने असे अधिकार व प्राधिकारांचे संपूर्ण विकेंद्रीकरण करून अनुसूचित क्षेत्रातील पंचायतींना शक्ती प्रदान करणे पेसा कायद्यान्वये अभिप्रेत आहे. सध्यस्थितीत महाराष्ट्र राज्यामध्ये अनुसूचित क्षेत्रात १३ जिल्हे, ५९ तालुके, २९३१ ग्रामपंचायती व सुमारे ८००० गावांचा समावेश असून या संपूर्ण क्षेत्रावर पेसा कायदा लागू झालेला आहे. तसेच राज्यामध्ये पेसा कायद्याची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने “महाराष्ट्र ग्रामपंचायती संबंधीचे उपबंध (अनुसूचित क्षेत्रांवर विस्तारित करणेबाबत) नियम, २०१४” लागू करण्यात आलेले आहेत.

भारतीय संविधानाच्या ५ व्या अनुसूचीनुसार मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांच्या संवैधानिक जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठी संदर्भ क्रमांक १ मधील शासन निर्णयान्वये मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयात "आदिवासी कक्ष" स्थापन करण्यात आला आहे. सदर कक्षाने केलेल्या सूचनांच्या आधारे आदिवासी विभागामार्फत "पथदर्शी प्रकल्प" सूरू करण्यात आला आहे. सदर पथदर्शी प्रकल्पाची मंजूरी व सनियंत्रण करण्यासाठी राज्यस्तरीय समितीची स्थापना करण्यात आली आहे. या समितीच्या ६ व्या बैठकीत ग्राम विकास विभागाच्या अंतर्गत “राज्यस्तरीय पेसा कक्ष” स्थापन करण्याचे निर्देश देण्यात आले होते. त्यानुसार संदर्भ क्रमांक २ मधील ग्राम विकास विभागाच्या शासन निर्णयानुसार पेसा कायद्याची अंमलबजावणी करण्यासाठी आणि त्यासोबतच “पेसा ग्रामपंचायतींना ५% अबंध निधी योजनेचे” राज्यस्तरावर नियंत्रण व सनियंत्रण करण्यासाठी राज्य पेसा कक्षाचे गठन करण्यात आले असून या कक्षाचे विभागप्रमुख म्हणून अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (मविसे) या दर्जाचे नियमित पद निर्माण करण्यात आलेले आहे.

भारतीय संविधानाच्या ५ व्या अनुसूचीमधील तरतूदींनुसार मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांच्या संविधानिक जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठी सहाय्य तसेच पेसा कायद्याची व पेसा विषयक योजनांची अंमलबजावणी, सनियंत्रण, मूल्यमापन या कामांची गरज व आवाका लक्षात घेता राज्यस्तरीय पेसा कक्षाकडे राज्य स्तरापासून गावपातळीपर्यंत सक्षम यंत्रणा, समर्पित व विषयतज्ञ मनुष्यबळाची आवश्यकता निर्माण झालेली आहे. या अनुषंगाने संचालक, राज्य (पेसा) यांनी पेसा कक्षाचे बळकटीकरण व विस्तार करण्यासाठी संदर्भ क्रमांक ३ अन्वये आदिवासी विकास विभागास सविस्तर प्रस्ताव सादर केला होता.

सदर प्रस्तावास आदिवासी विकास विभागाने सहमती दर्शवून ग्राम विकास विभागाकडील सुधारीत प्रस्तावानुसार प्रथम टप्प्यात बाह्यस्त्रोत यंत्रणेमार्फत भरावयाचे ८१ मनुष्यबळ, सदर मनुष्यबळाचे वेतन, भत्ते व इतर कार्यालयीन आवर्ती खर्चासाठी सन २०२२-२३ या वर्षापासून वार्षिक रूपये ५०० लक्ष निधीची अर्थसंकल्पिय तरतूद मंजूर केली आहे. या अनुषंगाने ग्रामविकास विभागाने

अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखालील उपसमितीकडे मनुष्यबळ/ सेवा निर्मितीसाठी पाठविलेल्या प्रस्तावास उपसमितीने दिनांक ०७ सप्टेंबर, २०२२ रोजीच्या बैठकीमध्ये ८१ मनुष्यबळ/ सेवा यापैकी ८० मनुष्यबळ/ सेवांना मान्यतेची शिफारस उच्चस्तरीय सचिव समितीकडे करण्यात आली. त्याअनुषंगाने मा. मुख्य सचिव, यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १३ डिसेंबर, २०२२ रोजी पार पडलेल्या ५ व्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीमध्ये सदर राज्य पेसा कक्षाच्या बळकटीकरण व विस्तारासाठी ८० मनुष्यबळ/ सेवांना मान्यता दिलेली आहे.

पेसा कायदा व पेसा विषयक योजना/उपक्रमांचा आवाका विचारात घेता आर्थिक व प्रशासकीय कामात गतीमानता व सुसुत्रता आणण्यासाठी ग्राम विकास विभागांतर्गत “राज्य पेसा कक्षाचे” बळकटीकरण व विस्तार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

***“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव”*** अंतर्गत ग्राम विकासाचे विविध उपक्रम राज्यात राबविणेबाबतचा धोरणात्मक निर्णय ग्राम विकास विभागाने दिनांक ६ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेतला असून सदर शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक ३.९ (i) नुसार **राज्य पेसा कक्षाचे बळकटीकरण** करण्याचे लक्ष निर्धारीत केले आहे. महाराष्ट्र राज्यातील अनुसूचित क्षेत्राची व्याप्ती मोठी असून या भागातील आदिवासी समुदायाच्या सर्वांगीण विकासाची संविधानिक जबाबदारी शासनाची आहे. त्याद्दष्टीने अनुसूचित क्षेत्रात पेसा कायद्याची अंमलबजावणी व मा. राज्यपाल महोदयांनी सोपविलेल्या जबाबदाऱ्या ग्राम विकास विभागास प्रभावीपणे व गतीमान व पारदर्शक पध्दतीने पार पाडता याव्यात यासाठी राज्य पेसा कक्षाचे बळकटीकरण करणेसाठी मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली ५ व्या उच्चस्तरीय सचिव समितीने (High Power Committee) मंजूर केलेली खालील तक्त्यात नमुद ८० “मनुष्यबळ/सेवा” या बाह्यस्त्रोत यंत्रणेमार्फत (outsourcing व्दारे) भरण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मनुष्यबळ/सेवा | मनुष्यबळ/सेवा संख्या |
|---|---|---|
| | **राज्य कक्षामधील मनुष्यबळ/सेवा** | |
| १ | राज्य पेसा समन्वयक (State PESA Coordinator) | १ |
| २ | प्रशिक्षण व क्षमता बांधणी तज्ञ (Training & Capacity Building Expert) | १ |
| ३ | सहाय्यक पेसा समन्वयक (Assistant PESA Coordinator) | २ |

| अ.क्र. | मनुष्यबळ/सेवा | मनुष्यबळ/सेवा संख्या |
|---|---|---|
| | **राज्य कक्षामधील मनुष्यबळ/सेवा** | |
| ४ | कार्यालयीन सहाय्यक (Office Assistant) | ३ |
| ५ | बहुद्देशीय कर्मचारी (Multitasking staff) | १ |
| | **जिल्हास्तरीय मनुष्यबळ/सेवा (१३ पेसा जिल्हा परिषदेसाठी प्रत्येकी १ प्रमाणे)** | |
| ६ | जिल्हा व्यवस्थापक (पेसा) (District Manager (PESA) | १३ |
| | **तालुकास्तरीय मनुष्यबळ/सेवा (५९ पेसा पंचायत समितीसाठी प्रत्येकी १ प्रमाणे)** | |
| ७ | तालुका व्यवस्थापक (पेसा) (Block Manager (PESA) | ५९ |
| | **एकूण** | **८०** |

**उपरोक्त मनुष्यबळाचे मानधन, शैक्षणिक अर्हता, अनुभव इत्यादी तपशील सोबत जोडलेल्या परिशिष्ट १ नुसार राहील. तसेच सदर मनुष्यबळाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या ग्राम विकास विभागामार्फत स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. वरील मनुष्यबळ/सेवा ग्राम विकास विभागाचे प्रचलित धोरण व कार्यपध्दतीनुसार विभागाच्या बाह्यस्त्रोत यंत्रणेमार्फत भरण्यात येतील. बाह्यस्त्रोत यंत्रणेमार्फत मनुष्यबळाच्या सेवा घेताना वित्त विभागाकडील दिनांक** २७ **एप्रिल,** २०२२ **च्या शासन निर्णयाचे अनुपालन करण्यात यावे. बाह्यस्त्रोत यंत्रणेमार्फत भरण्यात येणाऱ्या मनुष्यबळाचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर राहणार नाही तथा कायमस्वरुपी शासन सेवेत दाखल करुन घेण्याचा दावा करता येणार नाही.**

१) वरीलप्रमाणे मंजूर ८० **मनुष्यबळ/सेवा** या नियुक्त केलेले “पंचायतीसंबंधीचे उपबंध (अनुसूचित क्षेत्रांवर विस्तारित करणे) अधिनियम, १९९६ (पेसा कायदा) ची अंमलबजावणी सूरू असेपर्यंत व “अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतींना ५% पेसा अबंध निधी योजना” अंमलात असेपर्यंत किंवा राज्यशासनाच्या सेवानिवृत्तीच्या प्रचलित वयोमर्यादेपर्यंत कार्यरत राहतील. सदर मंजूर केलेल्या ८० मनुष्यबळ/ सेवा यांची मानधन निश्चिती करणे, सेवा व शर्ती लागू करणे, कर्तव्य व जबाबदाऱ्या निश्चित करणे, बाह्यस्त्रोत यंत्रणा नियुक्त करणे इत्यादीचे संपूर्ण अधिकार ग्राम विकास विभागास राहतील.

२) ग्राम विकास विभागाचे प्रचलित धोरणानुसार बाह्यस्त्रोत यंत्रणेमार्फत मनुष्यबळ/ सेवा यांच्या नियुक्त्या, मानधन, अनुज्ञेय भत्ते व इतर कायदेशीर दायित्व लागू करणे व कालानुक्रमे सुधारीत दराने अनुज्ञेय करणे, बाहयस्त्रोत यंत्रणेव्दारे उपलब्ध केलेले मनुष्यबळ यांच्या सेवा व शिस्तभंगविषयक

तसेच इतर अनुषंगिक बाबी इत्यादीचे अधिकार संचालक, राज्य (पेसा) यांचेकडे राहतील. याबाबत काही प्रश्न उद्भवल्यास ग्राम विकास विभागाचा निर्णय अंतिम राहील.

सदरहू शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौस ७३/आपुक, दिनांक ७ फेब्रुवारी, २०२३ व अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौस ९५/व्यय-१५, दिनांक २७ फेब्रुवारी, २०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१२११५१२८५३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARSHA MUNJA BHAROSE

Digitally signed by VARSHA MUNJA BHAROSE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1BD844032884BBF2167BC99CD85325223ACEEF69D02BD455B7CA6972491623E0, cn=VARSHA MUNJA BHAROSE
Date: 2023.06.19 12:48:26 +05'30'

**(वर्षा भरोसे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
४. मा. विरोधी पक्षनेते, विधान सभा,
५. मा. विरोधी पक्षनेते, विधान परिषद,
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
७. मा.प्रधान सचिव (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई,
८. मा.सचिव (वने), मंत्रालय, मुंबई,
९. संचालक, राज्य (पेसा), राज्य पेसा कक्ष, पुणे,

(परिशिष्ट-१)

मनुष्यबळ/सेवा अर्हता व अनुभव

| अ.क्र. | मनुष्यबळ/ सेवा | मनुष्यबळ/ सेवा संख्या | मानधनस्तर | मासिक मुळ मानधन (रू.) | शैक्षणिक अर्हता व वयोमर्यादा | कामाचा अनुभव |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | राज्य पेसा समन्वयक State PESA Coordinator | १ | वर्ग-१ (S-२०) स्तर - ०१ | ५६१०० | १) सामाजिक शास्त्र किंवा समाजकार्य विषयातील पदव्यूत्तर पदवी.<br>२) वयोमर्यादा खुल्या प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ३८ वर्षे व मागास प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ४३ वर्षे<br>३) अधीक कामाच्या अनुभवाची जास्तीतजास्त १० वर्षे शिथिलक्षम | १) राज्यस्तरीय कार्यालयांमधील प्रकल्प व्यवस्थापन, योजनांचे सनियंत्रण व मुल्यमापन, प्रशिक्षण व क्षमता बांधणी इ. कामांचा किमान १५ वर्षांचा अनुभव आवश्यक,<br>२) यापैकी शासकीय कार्यालयातील वरील कामांचा किमान १० वर्षांचा अनुभव आवश्यक,<br>३) आदिवासी व पेसा क्षेत्राशी संबंधीत प्रकल्पांमध्ये/उपक्रमांमध्ये राज्यस्तरीय शासकीय कार्यालयात काम केल्याचा अनुभव आवश्यक.<br>४) प्रकल्प अहवाल तयार करणे, वार्षिक अंदाजपत्रक तयार करणे इ. कामांचा अनुभव आवश्यक,<br>५) राष्ट्रीय व राज्य स्तरावरील विविध विषयांच्या कार्यशाळा, परिसंवाद, |

| अ.क्र. | मनुष्यबळ/ सेवा | मनुष्यबळ/ सेवा संख्या | मानधनस्तर | मासिक मुळ मानधन (रू.) | शैक्षणिक अर्हता व वयोमर्यादा | कामाचा अनुभव |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | प्रशिक्षणांमध्ये सहभाग नोंदविलेला असावा,<br>६) पेसा कायद्याचे उत्तम ज्ञान आवश्यक<br>७) संगणक हाताळण्याचे उत्तम ज्ञान आवश्यक, |
| २ | प्रशिक्षण व क्षमता बांधणी तज्ज्ञ (Capacity Building & Training Expert) | १ | वर्ग-२ (S-१५) स्तर - ०१ | ४१८०० | १) सामाजिक शास्त्र किंवा समाजकार्य किंवा एम.बी.ए. (मानव संसाधन) विषयातील पदव्यूत्तर पदवी.<br>२) वयोमर्यादा खुल्या प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ३८ वर्षे व मागास प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ४३ वर्षे<br>३) अधीक कामाच्या अनुभवाची जास्तीतजास्त १० वर्षे शिथिलक्षम | १) प्रकल्प व्यवस्थापन, प्रशिक्षण व क्षमता बांधणी विषयक व शैक्षणिक कामांचा किमान १० वर्षांचा अनुभव आवश्यक,<br>२) यापैकी शासकीय कार्यालयातील वरील कामांचा किमान ५ वर्षांचा अनुभव आवश्यक,<br>३) प्रशिक्षक म्हणून काम करण्याचे कौशल्य व राज्यस्तरीय प्रशिक्षण संस्थामध्ये प्रविण्य प्रशिक्षक म्हणून काम केल्याचा अनुभव असावा,<br>४) शासनाच्या किंवा शासन मान्य स्वयंसेवी संस्थेतील प्रकल्पात/उपक्रमामध्ये प्रकल्पाचे व्यवस्थापन व प्रशिक्षण इ. कामे केल्याचा अनुभव असावा,<br>५) प्रशिक्षण आराखडा तयार करणे, वार्षिक अंदाजपत्रक तयार करणे इ. कामांचा |

| अ.क्र. | मनुष्यबळ/ सेवा | मनुष्यबळ/ सेवा संख्या | मानधनस्तर | मासिक मुळ मानधन (रू.) | शैक्षणिक अर्हता व वयोमर्यादा | कामाचा अनुभव |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | अनुभव आवश्यक,<br>६) संगणक हाताळण्याचे उत्तम ज्ञान आवश्यक, |
| ३ | सहाय्यक पेसा समन्वयक (Assistant PESA Coordinator) | २ | वर्ग-३ (S-१०) स्तर - ०१ | २९२०० | १) समाजकार्य/ग्रामीण विकास विषयातील पदव्यूत्तर पदवी.<br>२) वयोमर्यादा खुल्या प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ३८ वर्षे व मागास प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ४३ वर्षे<br>३) अधीक कामाच्या अनुभवाची जास्तीतजास्त ७ वर्षे शिथिलक्षम | १) राज्य स्तरावरील कार्यालयांमधील प्रकल्प व्यवस्थापन, सनियंत्रण व मुल्यमापन, प्रशिक्षण व क्षमता बांधणी इ. कामांचा किमान १० वर्षांचा अनुभव आवश्यक,<br>२) यापैकी शासकीय कार्यालयातील वरील कामांचा किमान ५ वर्षांचा अनुभव आवश्यक,<br>३) संगणक हाताळण्याचे उत्तम ज्ञान आवश्यक,<br>४) ऑनलाईन अहवालीकरण, MIS इ. कामांचा अनुभव व उत्तम ज्ञान आवश्यक. |
| ४ | कार्यालयीन सहाय्यक (Office Assistant) | ३ | वर्ग-३ (S-०८) स्तर - ०१ | २५५०० | १) कोणत्याही शाखेचा पदवीधर, २) MS-CIT उत्तीर्ण, ३) शासनमान्य संस्थेकडील इंग्रजी (३० श.प्र.मि.) व मराठी (३० | १) कार्यालयीन व प्रशासकीय कामाचा किमान ५ वर्षांचा अनुभव आवश्यक.<br>२) यापैकी शासकीय कार्यालयातील प्रशासकीय कामकाजाचा किमान २ वर्षांचा अनुभव आवश्यक. |

| अ.क्र. | मनुष्यबळ/ सेवा | मनुष्यबळ/ सेवा संख्या | मानधनस्तर | मासिक मुळ मानधन (रू.) | शैक्षणिक अर्हता व वयोमर्यादा | कामाचा अनुभव |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | श.प्र.मि) उत्तीर्ण प्रमाणपत्र आवश्यक. ४) वयोमर्यादा खुल्या प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ३८ वर्षे व मागास प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ४३ वर्षे ५) अधीक कामाच्या अनुभवाची जास्तीतजास्त ५ वर्षे शिथिलक्षम | ३) संगणकाचे उत्तम ज्ञान आवश्यक. |
| ५ | बहुद्देशीय कर्मचारी (Multitasking staff) | १ | किमान वेतन अधिनियम | १२००० | १) उमेदवार १० वी उत्तीर्ण असावा.<br>२) वयोमर्यादा खुल्या प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ३८ वर्षे व मागास प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ४३ वर्षे<br>३) अधीक कामाच्या अनुभवाची जास्तीतजास्त ३ वर्षे शिथिलक्षम | १) कोणत्याही कार्यालयात काम केल्याचा किमान २ वर्षाचा अनुभव आवश्यक,<br>२) शासकीय कार्यालयात काम केले असल्यास प्राधान्य |

| अ.क्र. | मनुष्यबळ/ सेवा | मनुष्यबळ/ सेवा संख्या | मानधनस्तर | मासिक मुळ मानधन (रू.) | शैक्षणिक अर्हता व वयोमर्यादा | कामाचा अनुभव |
|---|---|---|---|---|---|---|
| ६ | जिल्हा व्यवस्थापक (पेसा) (District Manager (PESA) | १३ | वर्ग-३ (S-०८) स्तर - ०१ | २५५०० | १) समाजकार्य/ग्रामीण विकास विषयातील पदव्यूत्तर पदवी. २) वयोमर्यादा खुल्या प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ३८ वर्षे व मागास प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ४३ वर्षे ३) अधीक कामाच्या अनुभवाची जास्तीतजास्त ५ वर्षे शिथिलक्षम | १) प्रकल्प व्यवस्थापन, सनियंत्रण व मुल्यमापन, प्रशिक्षण व क्षमता बांधणी इ. कामांचा किमान १० वर्षांचा अनुभव आवश्यक,<br>२) यापैकी विभाग/जिल्हा/तालुका/ क्षेत्रिय स्तरावरील शासकीय कार्यालयातील वरील कामांचा किमान ५ वर्षांचा अनुभव आवश्यक,<br>३) आदिवासी व पेसा क्षेत्राशी संबंधीत प्रकल्पांमध्ये/उपक्रमांमध्ये शासकीय कार्यालयात काम केल्याचा अनुभव आवश्यक.<br>४) ऑनलाईन अहवालीकरण, MIS इ. कामांचा अनुभव व उत्तम ज्ञान आवश्यक.<br>५) पेसा विषयाचे ज्ञान, अनुभव असल्यास व अनुसूचित क्षेत्रातील जिल्ह्यातील अधिवास धारक असल्यास प्राधान्य.,<br>६) पेसा कायद्याचे उत्तम ज्ञान आवश्यक<br>७) संगणक हाताळण्याचे उत्तम ज्ञान आवश्यक, |

| अ.क्र. | मनुष्यबळ/ सेवा | मनुष्यबळ/ सेवा संख्या | मानधनस्तर | मासिक मुळ मानधन (रू.) | शैक्षणिक अर्हता व वयोमर्यादा | कामाचा अनुभव |
|---|---|---|---|---|---|---|
| ७ | तालुका व्यवस्थापक (पेसा) (Block Manager (PESA) | ५९ | वर्ग-३ (S-०६) स्तर - ०१ | १९९०० | १) समाजकार्य/ग्रामीण विकास विषयातील पदव्यूत्तर पदवी.<br>२) वयोमर्यादा खुल्या प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ३८ वर्षे व मागास प्रवर्गासाठी जास्तीतजास्त ४३ वर्षे ३) अधीक कामाच्या अनुभवाची जास्तीतजास्त ५ वर्षे शिथिलक्षम | १) प्रकल्प व्यवस्थापन, सनियंत्रण व मुल्यमापन, प्रशिक्षण व क्षमता बांधणी इ. कामांचा किमान ८ वर्षांचा अनुभव आवश्यक,<br>२) यापैकी जिल्हा/तालुका/क्षेत्रिय स्तरावरील शासकीय कार्यालयातील वरील कामांचा किमान ५ वर्षांचा अनुभव आवश्यक,<br>३) आदिवासी व पेसा क्षेत्राशी संबंधीत प्रकल्पांमध्ये/उपक्रमांमध्ये शासकीय कार्यालयात काम केल्याचा अनुभव आवश्यक,<br>४) ऑनलाईन अहवालीकरण, MIS इ. कामांचा अनुभव व उत्तम ज्ञान आवश्यक,<br>५) पेसा विषयाचे ज्ञान, अनुभव असल्यास व अनुसूचित क्षेत्रातील जिल्ह्यातील अधिवास धारक असल्यास प्राधान्य,<br>६) पेसा कायद्याचे उत्तम ज्ञान आवश्यक<br>७) संगणक हाताळण्याचे उत्तम ज्ञान आवश्यक, |

| अ.क्र. | मनुष्यबळ/ सेवा | मनुष्यबळ/ सेवा संख्या | मानधनस्तर | मासिक मुळ मानधन (रू.) | शैक्षणिक अर्हता व वयोमर्यादा | कामाचा अनुभव |
|---|---|---|---|---|---|---|
| | एकूण | ८० | | | | |

टिप - उपरोक्त मनुष्यबळ/सेवा या नियुक्त केलेल्या बाहयस्त्रोत यंत्रणेव्दारे मनुष्यबळासाठी ग्राम विकास विभागाने परिगणना केलेले व वित्त विभागाने मंजूर केलेले मासिक मानधन अदा करताना उद्योग, उर्जा व कामगार विभागाकडील परिपत्रक क्रमांक: सीएलए- ०३/ २०१४/ प्र.क्र.९५/ कामगार-१०, दिनांक १० जून, २०१४ व परिपत्रक क्र.संकिर्ण- २०१९/प्र.क्र.१३/कामगार-८, दिनांक २२ फेब्रुवारी, २०१९ मध्ये नमुद तरतूदींचे काटेकोरपणे पालन करावे.

.

==========================================================